**श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगाव क्षेत्रात मूलभूत सुविधा निर्माण करण्याचा विकास आराखडा. खळवाडी येथिल नागरिकांच्या पुनर्वसन प्रकल्पासह सुधारीत आराखड्यास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का.१४४४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
तारीख: २० जुलै, २०१७

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२००९/प्र.क्र.८०/का-१४४४, दिनांक ८ मार्च, २०१०**
२) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२००९/प्र.क्र.८०/का-१४४४, दिनांक ५ मे, २०११**
३) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का-१४४४, दिनांक २९ ऑक्टोंबर, २०१४**
४) **शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१२/प्र.क्र.२४/का-१४४४, दिनांक १८ जानेवारी, २०१६**

**प्रस्तावना**

श्री गजानन महाराज समाधी शताब्दी महोत्सवानिमित्त शेगांव येथे मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेनंतर, सन २००९ पासून विकास आराखडा राबविण्यात येत आहे. नियोजन विभागाच्या शासन निर्णय दि. ८.३.२०१० नुसार शेगाव विकास आराखड्यांतर्गत करावयाच्या कामांमध्ये खळवाडी येथील वाहनतळ व्यवस्था या कामासाठी रू. ५.०० कोटी इतकी रक्कम प्रस्तावित करण्यात आली होती. तद्नंतर शिखर समितीच्या दिनांक ७ जुलै, २०१४ रोजीच्या बैठकीमध्ये शेगांव विकास आराखड्यांतर्गत मुळ आराखड्यातील कामांमध्ये भाववाढीमुळे होणा-या रू.१११.०० कोटीच्या वाढीव (भूसंपादनासह) शासन सहभागास मान्यता देण्यात आलेली होती. सदर रू.१११.०० कोटीच्या मान्यतेमध्ये, खळवाडी येथिल वाहनतळ व्यवस्था या अंतर्गत खळवाडी येथिल शासकीय जमिनीवरील अतिक्रमणधारकांचे पुनर्वसन करण्यासाठी, आराखड्यांतर्गत रू.१९.०० कोटींची वाढीव शासन तरतुद करण्यास मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील शिखर समितीने मंजूरी दिली होती. तथापि, खळवाडी पुनवर्सनाचा प्रश्न न्यायप्रविष्ठ असल्यामुळे तसेच पुनर्वसनासाठी जागा व अंदाजपत्रक तयार झाले नसल्यामुळे, दिनांक १८ जानेवारी, २०१६ रोजीच्या सुधारीत विकास आराखड्याबाबतच्या शासन निर्णयामध्ये सदर पुनर्वसनाबाबतच्या वाढीव तरतुदीबाबत निर्णय घेण्यात आला नव्हता.

दरम्यान, शेगाव विकास आराखड्या संदर्भात श्री. आनंदीलाल भूतडा यांनी शेगाव नगरपरिषद आणि इतर ६ यांच्याविरुध्द मा. मुंबई उच्च न्यायालयाचे खंडपीठ, नागपूर मध्ये याचिका क्र. ५८५६/२००७ दाखल केली आहे. सदर याचिकेमध्ये मा. न्यायालयाने दिनांक २१ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या निर्देशानुसार, एक विशेष पुनर्वसन योजना म्हणून शेगाव संस्थानच्या शेजारील खळवाडी येथिल शासकीय जागेवरील अतिक्रमणधारकांचे पुनर्वसन श्री गजानन महाराज संस्थानाच्या अकोट रोडवरिल जागेवर करावयाचे आहे. सदर पुनर्वसनाकरिता सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती यांनी रू.६२,५५,७८,०००/- चे अंदाजपत्रक

सादर केलेले आहे. पुनर्वसनाबाबत मा. न्यायालयाचे निर्देश विचारात घेऊन, सदर पुनर्वसनाबाबतच्या रू.६२,५५,७८,०००/- च्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

खळवाडी परिसरातील शासकीय जागेवरील वाहनतळ व्यवस्थेचा खर्च आता शेगाव संस्थानकडून करण्यात येणार आहे. नियोजन विभागाच्या दिनांक १९ मे, २०१४ रोजीच्या पत्रानुसार, सदर आराखड्यांतर्गत एका कामामध्ये होणारी बचत ही आराखड्यातील अन्य कामांची व्याप्ती व किंमतीत वाढ झाल्यामुळे, आराखड्याच्या एकूण किंमतीच्या मर्यादेत कोणत्याही प्रकारे वाढ न करता समायोजित करण्याचे अधिकार विभागीय आयुक्त, अमरावती यांना देण्यात आलेले आहेत. त्यानुसार, विभागीय आयुक्त, अमरावती यांनी यांच्या दिनांक ९ जुन, २०१७ रोजीच्या आदेशानुसार, सदर आराखड्यांतर्गत उपलब्ध तरतुदीचे पुनर्विनियोजन करून प्रकल्पनिहाय कामांच्या सुधारित किंमतीस मान्यता प्रदान केली आहे. सदर आदेशानुसार, खळवाडी परिसरातील शासकीय जागेवरील वाहनतळ व्यवस्थेचा खर्च आता शेगाव संस्थानकडून करण्यात येणार असल्यामुळे सदर कामासाठी उपलब्ध करून देण्यात येणारा निधी अन्य कामांसाठी वळती करण्याचे प्रस्तावित केले आहे. त्यामुळे, शेगाव विकास आराखड्यासाठी मंजूर असलेला शासन सहभाग रू.३६७ कोटी निधीव्यतिरिक्त आराखड्यांतर्गत वरीलप्रमाणे पुनर्वसनाकरिता रू.६२,५५,७८,०००/- च्या वाढीव सुधारीत शासन सहभागास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. **<u>शासन निर्णय</u>**

शेगाव संस्थानच्या शेजारील खळवाडी येथिल शासकीय जागेवरील अतिक्रमणधारकांचे पुनर्वसन श्री गजानन महाराज संस्थानाच्या अकोट रोडवरिल जागेवर करण्यासाठीच्या पुनर्वसन प्रकल्पाच्या रू.६२,५५,७८,०००/- च्या आराखड्यास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे शेगाव तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांतर्गत शासनाचा सुधारीत सहभाग (रू.३६७.०० कोटी + रू.६२.५५७८ कोटी) रू.४२९,५५,७८,०००/- एवढा होत आहे.

३. **उपरोक्त पुनर्वसन प्रस्तावास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहेः-**

१) प्रस्तुत पुनर्वसन प्रकल्प राबविण्यापूर्वी सदरहू आराखड्यातील प्रत्येक कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार विभागीय आयुक्त, अमरावती विभाग यांना देण्यात येत आहेत.

२) प्रस्तुत पुनर्वसन प्रकल्प हा श्री गजानन महाराज संस्थानाच्या अकोट रोडवरिल जागेवर राबविण्यात येणार आहे. त्यानुषंगाने, मौजे खळवाडी, ता. शेगांव, जि. बुलढाणा येथिल २.६७ हे. आर. शासकीय जमीनीच्या बदल्यात, श्री गजानन महाराज संस्थान, शेगाव यांच्या मालकीची शेगाव अकोट रोडवरील ४.४५ हे. आर. जमीन ही खळवाडी येथिल शासकीय जमिनीवर अतिक्रमण करणा-या नागरिकांचे पुनर्वसन करण्यासाठी अदलाबदली करण्याची कार्यवाही महसूल विभागाकडून पूर्ण करण्यात यावी.

३) खळवाडी परिसरातील अतिक्रमणधारकांचे पुनर्वसन करण्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभाग ही कार्यान्वयीन यंत्रणा असेल.

४) शेगाव संस्थानच्या मालकीची शेगाव अकोट रोडवरील जमीन कृषी व तत्सम वापरा करिता आरक्षित असून ती No Development Zone मध्ये असल्यामुळे, सदर जागेचे आवश्यकतेनुसार आरक्षण बदलण्याची कार्यवाही नगर विकास विभागाकडून पूर्ण करण्यात यावी. तसेच खळवाडी परिसरातील शासकीय जमीनीचे आरक्षण रहिवासी वापरामधून वाहनतळ वापराकरिता आरक्षण बदलाची कार्यवाही नगरविकास विभागाकडून पूर्ण करण्यात यावी.

५) प्रस्तुत प्रकल्प राबविण्यापूर्वी आवश्यकता असल्यास, पर्यावरणीय दृष्ट्या आवश्यक ती ना हरकत संबंधित प्राधिकरणाकडून घेण्यात यावी.

६) अनिवार्य स्वरूपाच्या कामासाठी (देखभाल / दुरूस्ती इ.) सदरची तरतुद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदर पुनर्वसन प्रकल्पाच्या पुर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल / दुरूस्ती, संबंधित क्षेत्रिय यंत्रणांमार्फत करण्याबाबत जिल्हाधिकारी, बुलढाणा यांनी संबंधित यंत्रणांबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहिल. सदर पुनर्वसन प्रकल्पाच्या देखभाल दुरूस्तीसाठी शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करून दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी.

८) सदर पुनर्वसन प्रकल्पासाठी देण्यात येणा-या निधीमधून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती, तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे कार्यान्वयीन यंत्रणेने दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावीत.

९) पुनर्वसन प्रकल्पावरिल खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

१०) शेगाव तिर्थक्षेत्र विकास आराखड्यातील एकूण शासन सहभागाच्या मर्यादेत, एकाच उद्दिष्टाखालील एका मंजूर कामांमधील बचत ही त्याच उद्दिष्टाखालील अधिक खर्चाच्या दुस-या कामाकडे, समायोजित करण्याचे अधिकार, बचतीच्या कामांमध्ये भविष्यात अतिरिक्त निधीची मागणी करण्यात येणार नाही, या अटीच्या अधीन राहून, विभागीय आयुक्त, अमरावती विभाग यांना देण्यात येत आहेत.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-१००८/प्रक्र७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-१, उप विभाग-३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) नुसार, प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्रमांक ओ-८, ३४५२ पर्यटन, (००) (०३), श्री गजानन महाराज, शेगाव तिर्थक्षेत्र विकास विशेष कृती कार्यक्रम (३४५२ २७३१) " या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात येणा-या तरतुदीतून करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२०१६३५१०४४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Maya Roop Vasudeo
Date: 2017.07.20 16:34:09 +05'30'

**(मा. रू. वासुदेव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
३. मा.मंत्री (ग्रामविकास ) यांचे खाजगी सचिव

४. मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
५. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव
६. मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य ) यांचे खाजगी सचिव
७. मा. पालकमंत्री, बुलढाणा
८. मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव
९. मा.राज्यमंत्री (नगर विकास ) यांचे खाजगी सचिव
१०.मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
११. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
१२. शेगाव क्षेत्रातील संबंधित मा. विधानसभा सदस्य
१३.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
१४.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
१६.विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
१७.जिल्हाधिकारी, बुलढाणा
१८.वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
२०. मुख्याधिकारी, शेगाव नगर परीषद, शेगाव
२१. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई
२२. निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.